या रखवालदारांपैकी मधूनमधून कोणी तरी येऊन आमच्या मुलांच्या कागाळया करीत असे. 'तुमची मुलं चोऱ्या कशाला करतात? त्यांना म्हणावं, माझ्याकडे या! मी तुम्हाला उत्तमपैकी कलिंगड खायला घालीन!'

मी याचा डॉरमिटरीत एकदा उल्लेख केला. तेव्हा ते आमंत्रण मुलांनी आनंदाने स्वीकारले व रखवालदारांनी दिलेल्या उत्तम उत्तम कलिंगडांचा समाचार घेतला. कलिंगडे खाता खाता पीक-पाण्याच्या गप्पाही चालत. पिशव्या भरून लोक कलिंगडे घरी पण घेऊन जात. पहिल्या दिवशी आलेल्या बोलावण्याला बेलुखिननेच जावे असा बेर्शनेवने आग्रह धरला व इतरांनीही त्याला दुजोरा दिला. त्या दिवशी बेलुखिन कलिंगडांचा भरपूर समाचार घेऊन परत आला. त्याने आल्यावर खाल्लेल्या कलिंगडांची व यजमानांची तोंडभर स्तुती केली.

वेर्शनेव शांतपणाने बेलुखिनचे भाषण ऐकत असता काराबानोव तेथे आला. त्याने बेलुखिनला विचारले,

'काय, कशी काय झाली कलिंगडांची मेजवानी?'

'छानच झाली! आपण आपल्या शेजाऱ्यांशी खरोखरच चांगले संबंध ठेवले पाहिजेत!' बेलुखिन म्हणाला.

'हां, जरूर. तूच एकदा त्यांच्याकडे जा!' असे दोघेही त्याला म्हणाले.

'आपल्याला कोणी बोलावलं तर काही सगळयांनीच तेथे जायचं असतं का? ते फारच वाईट दिसेल. आपण काय थोडेजण आहोत? चांगले साठ॰ जण आहोत!'

दुसऱ्या दिवशीही वेर्शनेवने बेलुखिनलाच जायचा आग्रह केला. बेलुखिनने अगदी मोठेपणाने सांगितले, 'दुसऱ्या कोणाला तरी पाठवा!'

त्यावर वेर्शनेव म्हणाला, 'दुसरा कोणी नको. तूच जा! तू पाहिजे तर कलिंगडं खाऊ नकोस. फक्त गप्पा मारत बस!'

वेर्शनेवचे म्हणणे बेलुखिनला खरे वाटले; पण नुसत्या गप्पा मारण्यास काहीच हरकत नाही, हे त्याला पटले. म्हणजे आपण फक्त खाण्यासाठीच येतो असे रखवालदाराला वाटू नये; परंतु आज त्या म्हाताऱ्या रखवालदाराने बेलुखिनचे अगदी थंड स्वागत केले. आपल्या जाण्याचा हेतू स्पष्ट करण्याची संधी बेलुखिनला मिळाली नाही.

'हे पाहिलंस ना माझ्या हातात काय आहे?' असे म्हणत रखवालदाराने आपल्या हातातल्या बंदुकीकडे बोट दाखवले. 'तू चांगलाच बदमाश दिसतोस! मला इथं गप्पात गुंतवून ठेवलंस आणि तिकडे तुझ्या साऱ्या मित्रांनी माझ्या अर्ध्याअधिक कलिंगडांचा फडशा उडविला. याद राख, मी तुला चांगलाच धडा शिकवीन!'

बेलुखिनला आश्चर्याचा धक्काच बसला. तो कॉलनीत परत आला. रात्री डॉरमिटरीत त्याने झालेली हकीकत जोरजोराने सांगायला सुरुवात केली.

सारी पोरं पांघरूणाच्या आडून हसत होती. मिटचागिनने शांतपणाने त्याला विचारले, 'म्हाताऱ्या रखवालदारानं तुला आपलं वकीलपत्र दिलंय काय ? तू तर त्याच्या घरातच बसून कलिंगडं खाल्लीस. आम्ही तर अजून एकही कलिंगड पाहिलंसुद्धा नाही. त्याची कलिंगडे आम्हीच चोरली याला काय पुरावा आहे ?'

तो म्हातारा रखवालदार माझ्याकडे तक्रार घेऊन आला नाही; परंतु रोजच्या रोज कलिंगडांची खूपशी चोरी होत असावी असे मला खात्रीने वाटत होते.

एके दिवशी सकाळी डॉरमिटरीत संबंध जमिनीवर कलिंगडांच्या बिया पसरलेल्या दिसत होत्या. मी मॉनिटर्सना दम भरला. काही मुलांना शिक्षा केली आणि अशी घाण पुन्हा कधीही रहाता कामा नये, असेही सांगितले. खरोखर काही दिवस डॉरमिटरीत घाण दिसली नाही.

उन्हाळ्यात संध्याकाळच्या वेळी वाऱ्याची झुळूक येत असे. अशा वेळी कॉलनीत हास्याची खसखस पिकलेली ऐकू येई व एकदम सारे वातावरण गंभीर होऊन जात असे.

पाइन आणि मिंट झाडांचा मंद सुवास दरवळत असे. पक्ष्यांचे आवाज मधूनमधून येत असत. रात्रीच्या वेळी कुठून तरी कुत्र्यांचे ओरडणे लांबून ऐकू येई. अशाच एका रात्री मी माझ्या खोली बाहेर व्हरांड्यात उभा होतो. आमचा रात्र-पाळीचा मॉनिटर पहारा करीत होता. त्याने मला सहजच वेळ विचारली. सारे काही शांत होते; पण ही शांतता मला कशीशीच वाटली.

दुसऱ्या दिवशी इवानोविचने एकाएकी मला विचारले, 'घोड्यांना रात्री मोकळं सोडायचा तुम्ही हुकूम दिला काय ? ते चोरीला नाही का जाणार ?'

ब्रातचिन्कोने मध्येच तोंड घातले, 'घोड्यांना काय मोकळी हवा नको मिळायला ?'

मी गप्पच होतो.

दुसऱ्या दिवशी पुन्हा कालिनासाहेबांनी वेगळ्या तऱ्हेने तोच प्रश्न विचारला, 'काय, घोडे आजकाल खिडकीतून वाकून डॉरमिटरीत काय बघत असतात ?'

'तुमच्या म्हणण्याचा अर्थ मी नाही समजलो.'

'मग तुम्ही स्वतःच जाऊन पहा ना, म्हणजे तुम्हाला काय ते समजेल !'

मी स्वतः पाहून खात्री करून घेतली. त्यांनी सांगितलेले अगदी खरे होते. पब्लिक एज्युकेशन डिपार्टमेंटने त्यांना नकोसा झालेला एक बैल आम्हाला दिला

होता. तो बैल व आमचे घोडे पहाटेच्या वेळी डॉरमिटरीच्या खिडक्यांखाली कशाची तरी वाट बघत उभे होते.

मी तसाच डॉरमिटरीत गेलो आणि मुलांना हा काय प्रकार आहे म्हणून विचारले.

आफ्रिस्को बिछान्यात उठून बसला आणि त्याने हसत हसत ओरडून सांगितले, 'कोणी तरी जा रे आणि त्या घोड्यांना विचारा ते इथे कशासाठी उभे आहेत !'

पांघरुणाच्या खालून मुलांच्या खिदळण्याचे आवाज हळूहळू येत होते.

मिट्यागिन उठून बसत म्हणाला, 'हे असले चौकस घोडे कॉलनीत ठेवणे चुकीचंच आहे. आन्तोनसाहेब, तुमच्या डोक्याला आणखी ही कटकट कशाला ?'

मी ब्रातचिन्कोवर ओरडलो, 'दररोज सकाळी हे घोडे इथे कशासाठी उभे असतात ?'

बेलुखिनने मध्येच सांगितले, 'आन्तोनसाहेब, मी सांगतो. घोड्यांना काहीही इजा होणार नाही ! ब्रातचिन्को दररोज स्वत: हे घोडे इथे आणून सोडत असतो.'

'बस कर तुझी वटवट !' काराबानोव म्हणाला, 'आन्तोन, मी तुम्हाला खरं सांगतो, तुम्ही आम्हाला कलिंगडाच्या बिया व साली डॉरमिटरीत टाकायच्या नाहीत असं सांगितलं होतं; परंतु रोजच कुणाजवळ तरी कलिंगडं असतातच !'

'याचा अर्थ काय ?' मी विचारले.

'म्हणजे कधी कधी आम्हाला म्हातारा रखवालदार कलिंगडं देतो किंवा कोणी तरी शेजारच्या गावातनं कलिंगडं घेऊन येतं आणि मग बिया व साली कोठे फेकणार ? म्हणून आम्ही त्या घोड्यांना त्याची मेजवानी देतो !'

मी काही न बोलता डॉरमिटरीतून बाहेर पडलो. संध्याकाळी जेवणे झाल्यावर मिट्यागिन एक भले मोठे कलिंगड घेऊन माझ्याकडे आला. 'आन्तोनसाहेब, हे खाऊन बघा !'

मी त्याला विचारले, 'कुठून आणलं हे ? ते आणलंस तसंच घेऊन जा ! मला तुम्हा सर्वांना चांगला धडा शिकवायला पाहिजे !'

यावर मिट्यागिन म्हणाला, हे कलिंगड आम्ही चोरुन आणलेलं नाही. म्हाताऱ्या रखवालदारानं ते खास तुमच्यासाठी दिलंय ! ते आम्ही पैसे देऊन विकत आणलंय आणि खरोखरीच तुम्ही आम्हाला जरूर शिक्षा करा. आम्हाला राग येणार नाही !'

'तू ते कलिंगड घेऊन इथून जा !' असे मी त्याला निक्षून सांगितले.

थोड्या वेळाने मुलांचा एक घोळका ते कलिंगड घेऊन परत माझ्या ऑफिसात आला आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे बेलुखिन हा त्यांचा म्होरक्या होता. त्याला बोलताना हसू आवरत नव्हते, तो म्हणाला,

'आन्तोनसाहेब, हे सारे चोर रोज कलिंगडं खातात ! लपवून ठेवण्यात काय हाशील आहे ? ते जाऊ द्या, पण ते कलिंगडं कशी कशी मिळवतात हा मुख्य मुद्दा ! मला ते दररोज कलिंगडं खाऊ घालतात. मला कलिंगडं फार आवडतात हे त्यांना पक्कं माहीत आहे. आपल्या मुलींनासुद्धा कलिंगडं मिळतात आणि फक्त तुम्हालाच ती मिळत नाहीत; हे आम्हाला माहीत आहे. तुमच्या वाट्याला, फक्त या कलिंगडांमुळे वाईटपणा मात्र आला. म्हणून आम्ही सारेजण तुमची क्षमा मागतो आणि तुम्हाला हे कलिंगड खाण्याची विनंती करतो. मी या वेर्शनेवसारखा लुच्चा नाही हे तुम्हाला माहीत आहे. मी हे कलिंगड कामाच्या मोबदल्यात पैसे देऊन विकत आणलंय. इकॉनॉमिक पॉलिटिक्समध्ये सांगितल्याप्रमाणे जास्त किंमत देऊन आणलंय !'

असे म्हणून बेलुखिनने ते कलिंगड माझ्यापुढे ठेवले आणि तो गंभीरपणे बाजूला उभा राहिला.

मिट्यागिनच्या मागून डोकावून बघत वेर्शनेवने बेलुखिनची दुरुस्ती केली, 'एकॉनॉमिक पॉलिटिक्स नव्हे, पोलिटिकल इकॉनॉमी.'

'तेच, तेच !'

'तुम्ही हे कसं विकत घेतलंत ?' मी विचारलं.

काराबानोव पुढे सरसावला. तो बोटे घालून काय काय किंमत दिली ते सांगू लागला, 'हे पहा, त्या म्हाताऱ्या रखवालदाराच्या भांड्याला वेर्शनेवनं दांडा लावून दिला. गुडनं त्याचा बूट दुरुस्त करून दिला व मी अर्धी रात्र त्याच्या शेताची राखण केली.'

'त्या अर्ध्या रात्री तुम्ही किती कलिंगडं पळवली असतील याची मला चांगली कल्पना आहे !'

'अगदी बरोबर' बेलुखिन म्हणाला.

'मी याचं उत्तर देतो. आम्ही त्या म्हाताऱ्या रखवालदाराजवळ अलीकडे दोस्ती केलीय. पण जंगलाच्या पलीकडे कलिंगडाचं आणखी एक शेत आहे. तिथला रखवालदार भयंकर माणूस आहे ! तो केव्हाही मारायला तयार असतो !'

'छान ! तुम्ही तिथेही धाड घालायला सुरुवात केलीत का ?'

'नाही, नाही ! मी तिकडे जात नाही; पण कधीकधी बंदुकीचे आवाज ऐकायला येतात.'

कलिंगडाबद्दल मी मुलांचे आभार मानले.

काही दिवसांनी तो भयंकर माणूस अतिशय विमनस्क मनःस्थितीत माझ्याकडे आला. तो म्हणाला, 'तुम्ही तुमच्या मुलांना काही आळा घालू शकता का? इतके दिवस ही मुलं रात्रीची येऊन चोऱ्या करीत; पण आता दिवसाढवळ्या हे शेतात घुसतात! एकाच्या मागं लागलं तर बाकीचे सुटून जातात!'

मी मुलांना बोलावून सांगितले, 'हे पहा, मी स्वतःच आजपासून कलिंगडांची रखवाली करायला जाणार आहे किंवा कॉलनीच्या खर्चातून मी एक रखवालदार याला देतो.'

मिटघागिन म्हणाला, 'याच्या शब्दावर विश्वास ठेवू नका! हा मनुष्य शेताच्या आसपास जराही कुणाला फिरकू देत नाही!'

'पण तुम्ही तिकडे जाताच कशासाठी? तुमचं काय काम?'

'पण आम्ही कुठं जातो आणि काय करतो याच्याशी या रखवालदाराला काय कर्तव्य आहे?'

एक दिवस बेलुखिन येऊन मला म्हणाला, 'आन्तोन, या साऱ्याचा शेवट काही चांगला होणार नाही! म्हातारा रखवालदार अलीकडे शेतात बसायला घाबरतो. त्यानं आणखी दोघांना आपल्याबरोबर घेतलं आहे. शिवाय त्या साऱ्यांजवळ बंदुका असतात. आपली मुलं तर हट्टाला पेटलेली दिसतात आणि त्या लोकांनी गोळ्या चालवल्या तर काय होईल ते तुम्हीच पहा!'

त्या दिवशी रात्री आमची मुले कलिंगडाच्या शेतात घुसली. त्यांना दिलेल्या जुजबी सैनिकी शिक्षणाचा उपयोग झाला. जवळजवळ अर्धी मुले शेताच्या कडेने पसरली होती. रखवालदारांनी हाळी मारताच मुलांनी त्याला प्रत्युत्तर दिले आणि ती एकदम चाल करून गेली. ते सारे रखवालदार बंदुका तिथेच टाकून जंगलात पळून गेले. काही मुले कलिंगडे तोडून खाली फेकू लागली. काही जणांनी झोपडीला आग लावली. कोणी एक रखवालदार कॉलनीत आला आणि त्याने मला उठवले. मी घाईघाईने त्याच्याबरोबर त्या छोटचाशा लढाईच्या जागी गेलो.

ती संबंध झोपडी पेटत होती. आम्ही शेताच्या रोखाने जात होतो. त्या वेळी बंदुकीचे आवाज ऐकायला आले. काही मुले शेतात आडवी झालेली मला दिसली. मधूनमधून ती मध्येच उभी राहत. शेताच्या उजव्या बाजूला मिटघागिन उभा राहून 'सरळ जाऊ नका!' अशा सूचना देत होता.

'बंदुकांचे आवाज कुठून येत आहेत?' मी त्या म्हाताऱ्या रखवालदाराला विचारले.

त्यावर तो म्हणाला, 'मलाही समजत नाही. झोपडीत तर कोणी नसावं.

बहुधा बंदूक तशीच टाकून ते गेले असावेत आणि बंदुकीच्या गोळ्या आपोआप सुटत असाव्यात !'

थोड्या वेळाने सगळे शांत झाले. मुले कुठल्या कुठे नाहीशी झाली होती. तो म्हातारा रखवालदार आपल्या घरी गेला आणि मी पण कॉलनीत परत आलो. मुले नुसतीच झोपलेली नव्हती तर ती मोठमोठ्याने घोरत होती. असे घोरणे यापूर्वी मी कधीच ऐकले नव्हते !

'हे घोरण्याचं नाटक बस करा आणि सगळेजण उठून बसा !'

पण कोणीही उठण्याचे चिन्ह दिसेना. घोरणे तेवढे थांबवले होते. मी पुन्हा एकदा जोरात उठण्याची सूचना दिली. हळूहळू पांघरुणातून थोडी डोकी बाहेर आली. मिट्यागिन डोळे विस्फारून माझ्याकडे बघत होता. जणू काही झालेच नाही अशा थाटात 'काय झालं ?' असे त्याने मला विचारले; पण काराबानोवला राहवले नाही. तो म्हणाला, 'बस कर मिट्यागिन !'

सारेजण उठून माझ्याभोवती गोळा झाले व थोड्या वेळापूर्वी झालेल्या गोष्टीचे रसभरित वर्णन करू लागले. तारानेट मध्येच कोणी तरी चावल्यासारखा उडी मारून उठला व म्हणाला, 'त्या झोपडीत काय बंदुका होत्या ?'

'हो, पण त्या जळून गेल्या !'

'नाही रे, लाकूड तेवढं जळालं बाकी सगळं उपयोगात आणता येईल !' यावर तारानेट उठून डॉरमिटरीच्या बाहेर निघून गेला.

मी गंभीरपणाने बोलायला सुरवात केली.

'हे बघा, तुमच्या दृष्टीनं ही एक मोठी गंमत असेल; पण ही शुद्ध दरोडेखोरी आहे ! मला यापुढं हे सहन करणं शक्य नाही ! तुम्हाला जर हे असंच चालू ठेवायचं असेल तर आपण एकमेकांना रामराम ठोकू या ! रात्रंदिवस कॉलनीत व आजूबाजूच्या भागात तुमच्या वर्तनामुळं झाली एवढी बदनामी बस झाली !'

काराबानोवनं माझा हात धरला आणि तो म्हणाला, 'मी शपथ घेऊन सांगतो की, पुन्हा असं घडणार नाही ! आम्ही फारच वाहावत गेलो होतो !'

सगळ्यांनी त्याच्या म्हणण्याला माना डोलावल्या.

'यात काही अर्थ नाही,' मी म्हटले, 'ही तुमची नुसती पोकळ आश्वासनं मला नकोत. मी तुम्हाला आजपर्यंत अनेकदा सूचना दिल्या. अशानं मला काहीजणांना कॉलनीतून हाकलून काढावं लागेल ! हा माझा शेवटचा इशारा आहे !'

दुसऱ्या दिवशी गाड्या शेताकडे गेल्या व जळून राहिलेले सामान घेऊन आल्या.

माझ्या टेबलावर बंदुकीचे उरलेसुरले भाग येऊन पडले होते. 

# २२

## विच्छेदन

कबूल केल्याप्रमाणे मुलांनी व त्यांचे म्होरके काराबानोव व मिटयागिन यांनीही कलिगडांच्या शेतावर धाडी घालण्याचे, तसेच गावकऱ्यांच्या साठवणुकी-वर हल्ला मारायचे थांबवले नाही. अखेरीस त्यांनी एक विचित्र बनाव बनवून आणला. त्याचे पर्यवसान काही चांगल्या गोष्टी व काही वाईट गोष्टी घडण्यात झाले.

एका रात्री त्यांनी ल्यूका सेमियानोविचच्या बागेत धाड घातली आणि मधाची दोन पोळी मधमाशांसकट कॉलनीत आणली. ती आणून त्यांनी रात्रीच्या वेळेला चामड्याचे काम चालत असे त्या खात्यात ठेवली. या मेजवानीत बऱ्याच मुलांनी भाग घेतला. भाग घेणाऱ्यांची यादी व्यवस्थित तयार करता आली. कारण प्रत्येकाचे तोंड सुजून लाल झालेले होते. लेशीही त्यातून सुटला नाही. तो नेहमी-प्रमाणे एकातेरीनाबाईंच्याकडे मलमपट्टी करण्यासाठी गेला. त्या वेळी हा सगळा प्रकार उघडकीला आला.

मिटयागिनला ऑफिसमध्ये बोलावून विचारले असता त्याने 'हे सर्व कर्तृत्व आपलं एकट्याचंच आहे' असे सांगितले. त्याने आपल्या सहकाऱ्यांची नावे सांगण्याचे नाकारले आणि 'त्यात एवढं रागवण्यासारखं काय आहे ?' असे उलट आश्चर्याने विचारले. तो म्हणाला 'आम्ही ती पोळी मध खाण्यासाठी आणली नसून माशा पाळण्यासाठी आणली आहेत. तुम्ही नको म्हणत असलात तर ती मी परत देऊन टाकीन !'

'परत काय देणार कपाळ ? मध खाऊन टाकलाय आणि माशा उडून गेल्यात ! '

यावर तो शांतपणे म्हणाला, ' जशी तुमची मर्जी ! मी ते चांगल्या हेतूनं केलं होतं. '

' हे पहा मिटयागिन, तू कॉलनी सोडून जाणं हेच उत्तम असं मला वाटू लागलंय. तू तसा आता जाणता आहेस. तुझं आणि माझं पटणं मला अशक्यच वाटतंय. आपण एकमेकांचा निरोप घेणं हेच उत्तम. '

' तुमचं म्हणणं मला मान्य आहे. ' तो शांतपणे मला म्हणाला.

मिटयागिनला शक्य तितक्या लवकर काढून लावणे अत्यंत जरुरीचे होते. मी आतापर्यंत चालढकल करीत होतो. परंतु यापुढे डोळेझाक करून चालणार नव्हते. त्यामुळे कॉलनीतली सर्वच मुले हळूहळू हाताबाहेर गेली असती. कलिंगडांच्या शेतावर धाडी घालणे किंवा मधाची पोळी काढून आणणे हे जरी फार मोठे गुन्हे नसले तरी मुलांचे लक्ष याच गोष्टीवर जास्तीत जास्त केंद्रित व्हायला लागलेले होते. रात्रंदिवस हाच विचार त्यांच्या डोक्यात घोळत असे. त्यामुळे कुठच्याही चांगल्या गोष्टी त्यांच्या हातून घडण्याचे लक्षण दिसेना. याचा परिणाम म्हणजे त्यांची सर्वांगीण वाढच जणू खुंटल्यासारखी झाली होती. बारकाईने पहाणाऱ्याला या खुजेपणात इतरही गोष्टींची भर पडत, चाललेली लक्षात येण्यासारखी होती. उदा. उद्धटपणा, बेफिकिरी व बेजबाबदारी यांसारख्या अवगुणांची वाढ व्हायला लागली होती. झादारोव व बेलुखिनसारखे आमचे खंदे आधारस्तंभ स्वतः जरी चोरी–चहाडीत भाग घेत नसले तरी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची झलक कमी व्हायला लागली होती. राजकीय विषयांच्या पुस्तकांचे वाचन संपुष्टातच आले होते नि त्याऐवजी मुलांच्या हातात कसली तरी नादान, साहसी विषयावरील पुस्तके दिसू लागली होती. तसल्याच पुस्तकांवर त्यांचे वाचन व चिंतन चालत होते. या सगळ्याचा कॉलनीच्या एकंदर दैनंदिन कार्यक्रमावर वाईट परिणाम होत होता. कॉलनीचे सगळे वातावरण बिघडूनच गेले होते. हळूहळू अस्वच्छता, गबाळेपणा भरपूर दिसू लागला होता.

मी मिटयागिनसाठी सुटकेचा हुकूम लिहिला. ' मी ओडेसाला जाणार आहे, ' तो म्हणाला. मी त्याला वाटखर्चाला पाच रुबल दिले, पुढील आयुष्य सुखाचे जावो अशी सदिच्छा व्यक्त केली.

' मी मुलांना शेवटचं भेटू का ? ' मिटयागिनने विचारले.

' हो जरूर भेटून जा ! ' मी सांगितले.

मिटयागिनचा निरोपसमारंभ कसा झाला तो मला माहीत नाही; पण तो

बऱ्याच उशीरा कॉलनीतून बाहेर पडला. सर्वच्या सर्व मुले त्याला फाटकापर्यंत पोचवायला गेलेली दिसली.

त्या रात्री सगळी मुले उदासीन दिसत होती. काराबानोव एक पेटी घेऊन ती साफ करीत भंडारखोलीच्या बाहेर बऱ्याच उशीरापर्यंत बसून राहिला होता.

रात्री लेशी माझ्या ऑफिसमध्ये आला. तो म्हणाला, ' मिटयागिन गेल्यामुळे कसं सुनंसुनं वाटतंय, नाही ?'

मी त्यावर काहीही प्रत्युत्तर केले नाही. तो बराच वेळ थांबला आणि आला तसा निघून गेला.

त्या रात्री मी खूप उशीरापर्यंत माझ्या खोलीत बसून लिहित होतो. रात्री दोन वाजता मी झोपायला जाण्यासाठी उठलो. घोड्यांच्या तबेल्यात मला दिव्याचा अंधुक उजेड दिसला. मी ब्रातचिन्कोला उठवून विचारले की, ' तबेल्यात माळ्या-वर कोण बसलं आहे ?'

त्याने नाखुषीनेच उत्तर दिले, ' कदाचित मिटयागिनच बसलेला असेल !'

' तो अजून इथं कसा ?' मी विचारले.

' मला काय माहीत ?' असे ब्रातचिन्को म्हणाला.

मी माळ्यावर चढून पाहिले तेव्हा दिव्यासभोवती बरीच मंडळी बसलेली दिसली– वोल्कोव, लेशी, प्रिखोदकोव, असादची, काराबानोव व मिटयागिन. त्या सर्वांनी माझ्याकडे फक्त शांत नजरेने बघितले. मिटयागिन काही तरी करीत होता; पण अपुऱ्या उजेडामुळे मला ते नीटसे दिसले नाही.

' खाली उतरून तुम्ही सारेजण माझ्या ऑफिसात या !' असे मी त्यांना सांगितले.

माझ्या ऑफिसच्या दरवाजाशी आल्यावर काराबानोव म्हणाला, ' सर्वांनी आत येण्याचं काही कारण नाही. मी आणि मिटयाटिन काय ते सांगू !'

मी याला काही विरोध केला नाही. आत गेल्यावर काराबानोवने बैठक मारली; पण मिटयागिन मात्र एका कोपऱ्यात उभा राहिला. मी मिटया-गिनला विचारले,

' तू कॉलनीत परत का आलास ?'

' काही नाही. एक काम पुरं करायचं होतं.'

' कसलं काम होतं ?' मी विचारले.

' छोटंसंच काम होतं,' मिटयागिन म्हणाला.

इतक्यात काराबानोव उठून माझ्या टेबलाजवळ आला. टेबलावर दोन्ही

हात टेकवून जळजळीत डोळयांनी माझ्या डोळयांत बघत म्हणाला, 'काय काम होतं सांगू, आन्तोन ? मी पण मिट्यागिनबरोबर कॉलनी सोडून जाणार आहे !'

'पण तुम्ही माळयावर बसून काय करीत होतात त्याचं आधी उत्तर द्या !'

'तसं विशेष काहीच नाही !' असे काराबानोवनें उत्तर दिले,

'पण खरं सांगू, मी व मिट्यागिन तुमच्या कॉलनीच्या शिस्तीत बसत नाही म्हणून मी पण मिट्यागिनबरोबर जात आहे. आम्ही कुठंही आमचं नशीब काढू ! आमच्या जागी तुम्ही चांगली मुलं अवश्य भरती करा !'

काराबानोव नेहमीच असा अभिनय करीत असे. आताही आपण दुखावली गेलो आहो असे उगीचच तो दाखवीत होता. मिट्यागिनवर मी अन्याय करतो आहे असेच जणू त्याला भासवायचे होते व कदाचित मी कॉलनीत राहू द्यायची परवानगी देईन असे त्याला वाटत असावे.

मी काराबानोवकडे पहात परत तोच प्रश्न केला, 'तुम्ही माळयावर बसून काय करीत होता ?'

काराबानोवने मिट्यागिनकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहिले. मी उठून काराबानोव-जवळ गेलो.

'तुमच्या खिशात पिस्तूल आहे काय ?' मी विचारले.

'मुळीच नाही !' काराबानोवने जोरात म्हटले, 'तुम्ही काय माझी झडती घेणार आहात काय, आन्तोन ?' त्याने मला विचारले.

'तुमचे खिसे मोकळे करून दाखवा !' असा मी त्यांना शांतपणाने हुकूम केला.

'बघा, बघा काय बघता ते !' असे म्हणून चिडून काराबानोवने सारे खिसे मोकळे केले, तेव्हा थोडे भाकरीचे तुकडे त्याच्या खिशातून बाहेर पडले.

मी मिट्यागिनच्या जवळ गेलो आणि खिसे खाली करण्यास त्याला हुकूम केला.

मिट्यागिनने खिसे खाली करायचे नाटक केले आणि त्यातून एक छोटेसे चामडयाचे पाकीट, एक किल्ल्यांचा जुडगा बाहेर काढला आणि निर्लज्जपणे हसत, 'झालं समाधान ?' असे मला विचारले.

मी त्याच्या पॅन्टच्या पट्टयाला हात घातला आणि एक मध्यम आकाराचे पिस्तूल काढले. त्यात तीन काडतुसे होती. ते हातात धरून मी 'हे कुणाचं आहे ?' असे त्या दोघांनाही विचारले.

'ते माझं पिस्तूल आहे !' काराबानोव म्हणाला.

'तुम्ही खोटं का बोललात ? ठीक आहे. तुम्ही दोघांनी कॉलनी सोडून

जायंच योग्य आहे!' मी लगेच काराबानोवच्या सुटकेचा हुकूम लिहिला. त्याने तो हुकूम घेतला; पण पाच रुबल्स मात्र घेण्याचे नाकारले तो. म्हणाला,

'मला त्याची गरज नाही!'

त्याने अभिवादन करण्यासाठी आपला हात माझ्यापुढे केला. त्याचा हात थरथरत होता. त्याला काही तरी सांगायचे होते, पण सांगता येत नव्हते. तो घाईघाईने बाहेर पडला आणि अंधारात दिसेनासा झाला. मिटयागिन मात्र पक्का बेरकी! त्याने अभिवादन केले नाही. त्याने आपले खिसे नीट केले व काही न बोलता खांदे उडवीत काराबानोवच्या मागोमाग तो बाहेर पडला.

मी दरवाजाच्या बाहेर आलो. मुलांचा घोळका बाहेर जमलेला होता. लेशी जाणाऱ्या दोघांच्या पाठोपाठ फाटकापर्यंत गेला. ब्रातचिन्को काही तरी पुटपुटत पायरीवर उभा होता. बेलुखिनने त्या भयाण शांततेचा भंग केला, 'झालं ते फार उत्तम झालं. हे एकदा केव्हा तरी व्हायलाच हवं होतं!'

त्यावर वेर्शनेव अडखळत म्हणाला, 'योग्य असेल रे; पण मला त्यांच्याबद्दल वाईट वाटतंय!'

'कुणाबद्दल वाईट वाटतंय?' मी विचारले.

'तेच. काराबानोव आणि मिटयागिनबद्दल.'

'मला तुझीच कीव येते. तू अगदी मूर्ख आहेस! मिळालेल्या शिक्षणाचा तुझ्या डोक्यावर काही परिणाम झालेला नाही!' बेलुखिन वेर्शनेवला म्हणाला.

दोन दिवस या गेलेल्या मुलांबद्दल काही ऐकले नाही. काराबानोवचा बाप स्तारत्झोवोए गावात रहात होता. तो आपल्या बापाकडे जाईल याबद्दल शंका नव्हती; पण मिटयागिनच्या भवितव्याबद्दल मला शंका होती. तो रस्त्यातून भटकत बारीकसारीक चोऱ्या करून नक्कीच एखाद्या जेलमध्ये जाऊन पडेल किंवा एखाद्या मोठ्या लफड्यात सापडून सहा वर्षे जेलमध्ये जाईल किंवा दरोडेखोरांच्या टोळीकडून मारला जाईल. कदाचित फाशीची शिक्षा होईल! त्याला दुसरा काही मार्गच नव्हता. वाईट एवढेच की, तो कदाचित काराबानोवला आपल्याबरोबर भागीदार करून घेईल. दोघेही वाटमारी करीत रहातील. नाही तरी एके काळी काराबानोव वाटमारी करीत होताच.

दोन दिवसांनी कॉलनीत एक बातमी उठली की, काराबानोव आणि मिटयागिन शहराकडे जाणाऱ्या मोठ्या रस्त्यावर वाटमारी करीत आहेत. त्यांनी नुकतेच जवळच्या खेड्यातल्या खाटिकांना लुटले आहे.

'तुम्हाला कोणी सांगितलं हे?'

'शेजारच्या गावातल्या दूधवालीनं ही बातमी आणली,' असे मुले

आपापसात कुजबुजत असत. कोणीही जवळ गेला की, एकदम गप्प रहात. मोठ्या मुलांनी अभ्यास करायचे सोडूनच दिले होते. दोन-दोन, तीन-तीन जण मिळून आपापसात कुजबुजत.

शिक्षकमंडळी गेलेल्या दोन्ही मुलांचा उल्लेख करायचे टाळीत; पण एक दिवस लिडियाबाई म्हणाली, 'काही असलं तरी ती दोघं गेली म्हणून वाईट वाटणं साहजिकच आहे.'

मी गंमतीने तिला म्हटले, 'आपण एक ठरवू या. ते गेल्याबद्दल तू भरपूर दु:ख व्यक्त कर; पण ते माझ्यासमोर मात्र नको, एवढंच !'

'बरं बुवा ! ' ती जरा घुश्श्यातच म्हणाली.

चारपाच दिवसानंतर मी व ब्रातचिन्को शहरातून परत येत होतो. ब्रातचिन्को खाली मान घालून काही तरी विचार करीत माझ्या शेजारी गाडीत बसला होता. रेडला गेल्या उन्हाळ्यात भरपूर खायला मिळाल्यामुळे तो गुबगुबीत झाला होता. एकाएकी ब्रातचिन्कोने समोर पाहिले आणि तो ओरडला,

'आन्तोनसाहेब, समोर पाहिलंत का ? आपले काराबानोव आणि मिटयागिन रस्त्याच्या मधोमध उभे आहेत !'

मी पाहिले तेव्हा दोन व्यक्ती दिसत होत्या. ब्रातचिन्कोने त्यांना बरोबर ओळखले होते. त्याला कसेसेच वाटत होते. तो माझ्याकडे बघून म्हणाला,

'तुम्ही तुमचं पिस्तूल हाताशी ठेवा. कदाचित त्याची जरूरी लागेल ! '

'काही तरी खुळ्यासारखं बोलू नकोस,' असे मी त्याला सांगितले.

'ठीक आहे. तुम्हाला योग्य वाटेल तसं करा !'

ब्रातचिन्कोने लगाम खेचला आणि गाडी भरधाव त्या दोघांजवळ येऊन पोचली. जवळ येताच काराबानोव म्हणाला,

'बरं झालं आपण परत भेटलो. त्या दिवशी नाही तरी आपण व्यवस्थित निरोप घेतलाच नव्हता !'

मिटयागिनने आपले नेहमीचेच बेरकी हसू आणले.

'तुम्ही इथं काय करत आहात ?' मी विचारले.

'आम्ही तुम्हाला भेटण्यासाठीच इथं रेंगाळत आहोत. कॉलनीत येण्याची तुम्ही आम्हाला मनाई केली आहे ना ? म्हणून आम्ही तिकडे आलो नाही ! '

'तुम्ही ओडेसाला जाणार होता ना ?' असे मी त्यांना विचारले.

'सध्या तरी आम्ही इथंच रहाणार आहोत. हिवाळ्यानंतर आम्ही ओडेसाला जाऊ ! '

'तुम्ही काही काम करीत नाही का ?'

'पाहू. हळूहळू काही तरी काम करू. आन्तोनसाहेब, त्या दिवशीच्या प्रकारामुळं आम्ही तुमच्यावर रागावलो असं समजू नका. प्रत्येकाला आपलं कर्तव्य करावंच लागतं!' मिटचागिन म्हणाला.

काराबानोव खुशीत असलेला दिसला.

मी विचारले, 'तू मिटचागिनबरोबरच रहाणार आहेस का ?'

'मला आत्ताच काही सांगता येत नाही. मी त्याला माझ्या वडिलांकडे चल असा आग्रह करीत आहे; पण तो काही तरी सबबी सांगतोय!'

'त्याचा बाप पक्का इरसाल शेतकरी आहे. मला तसल्या लोकांचा चांगलाच अनुभव आलाय!' असे मिटचागिन म्हणाला.

ते रस्त्याच्या वळणापर्यंत आमच्याबरोबर चालत आले आणि काराबानोव म्हणाला,

'आमच्याबद्दल मनात राग ठेवू नका हं! आपण एकमेकांना शेवटचं आलिंगन देऊ या!'

'तू म्हणजे अगदी भलताच भावनाप्रधान आहेस हं!' मिटचागिन काराबानोवला म्हणाला.

'आणि तू काय कमी आहेस होय, मिटचागिन!'

त्यावर ते दोघेही इतक्या मोठ्यांदा हसले की त्यांच्या हास्याचा प्रतिध्वनी बाजूच्या जंगलातून उमटला. ते दोघे लांब जाईपर्यंत हात हलवून दाखवीत होते.



२३

# वेचक बियाणं

हिवाळ्याच्या अखेरीस कॉलनीचे एकदर वातावरण अतिशय उदासीन होते. असे औदासिन्य कॉलनीच्या इतिहासात आम्ही कधीही अनुभवले नव्हते. काराबानोव आणि मिटचागिन यांच्या हकालपट्टीचा हा सारा परिणाम होता. आमच्या कॉलनीतल्या सर्व मुलात ते दोघे अतिशय हुषार होते आणि त्यांची सर्व मुलांवर मोठीच पकड बसलेली होती. म्हणून त्यांची गैरहजरी सर्वांना तीव्रतेने भासत होती.

मिटचागिन व काराबानोव उत्तम कार्यकर्ते होते. काराबानोव कोणतेही काम अतिशय मन लावून करीत असे. त्याला काम करण्यात खराखुरा आनंद मिळत असे आणि तो इतरांनाही त्यांची अनुभूती मिळवून देत असे. त्याच्या नसानसातून उत्साह आणि शक्ती जणू वाहात असे. आळशी लोकांबद्दल तो सहसा कुरकुरत नसे; परंतु अंगचोरपणा करणाऱ्यांवर तो कमालीचा उखडत असे. मिटचागिन हा जणू काराबानोवचे उरलेसुरले गुण भरून काढीत होता. एरवी चोरी करताना जी शिताफी व हुषारी त्यांच्या अंगी दिसे, त्याउलट कामाच्या वेळी मात्र सर्व हालचाली शिस्तबद्ध आणि नीटनेटक्या असत. ते दोघेही कॉलनीच्या दैनंदिन जीवनात उत्साहाने व आनंदाने भाग घेत त्यामुळे कॉलनीत उत्साह व तरतरीतपणा राहात असे.

त्यांच्या जाण्यामुळे एकाएकी साऱ्या कॉलनीच्या दैनंदिन जीवनावर अवकळा आली. वेर्शनेवने स्वतःला आपल्या पुस्तकात उबवून घेतले. बेलुखिनच्या विनोदी

स्वभावात एक प्रकारची कटुता निर्माण झाली. वोल्कोव, प्रिखोदकोव व असादची हे कमालीचे गंभीर आणि शांत झाले. आमची बच्चेमंडळी कंटाळलेली दिसू लागली. सबंध कॉलनीवरच एक प्रकारचे अकाली प्रौढत्व प्राप्त झाल्यासारखे भासेत होते. कुठेही हसण्याखिदळण्याचे वातावरण दिसेना. प्रत्येक जण आपापल्या कामात गढल्यासारखा दिसत होता. आमचा एकटा झादारोव तेवढा आनंदी व उत्साही दिसत होता; परंतु त्याच्या आनंदात वाटेकरी व्हायला कोणीच नव्हते. त्यामुळे त्याच्याही खिलाडू वृत्तीत एक प्रकारचा औपचारिकपणा आला होता. तोसुद्धा आपला जास्तीत जास्त वेळ अभ्यास करण्यातच घालवीत असे किंवा गेल्या वसंत ऋतूत बनवायला घेतलेले वाफेचे इंजिन बनविण्यात घालवीत असे.

यात आणखी भर म्हणजे आमचे शेतीचे प्रयोगहो फारसे फलद्रूप झाले नव्हते. त्यामुळे आम्ही आणखी खिन्न झालो होतो. कालिनासाहेबांचे शेतीचे ज्ञान बेताबेताचेच होते आणि त्यांनी केलेले प्रयोग बरेचसे फसले होते. त्यातच शेतकऱ्यांकडून आम्ही घेतलेल्या जमिनी पडीक अवस्थेत होत्या. त्यामुळे मुलांनी केलेले आत्यंतिक श्रम वाया गेले होते. आणि गव्हाच्या पिकाऐवजी बरेचसे गवतच आमच्या हातात पडले होते. मोसमी पिके काढण्याचा आमचा प्रयत्न सपशेल वाया गेला होता. त्यामुळे बीट व बटाट्याचें पीक आमच्या हाती काही लागलेच नाही.

शिक्षकवर्गावरही निराशेची छाया पसरली होती. कदाचित आम्ही सगळेच जण थकलेले असू. कॉलनी सुरू झाल्यापासून आम्ही कोणीही एकही दिवसाची सुट्टी घेतली नव्हती; पण त्याबद्दल कोणी तक्रारही कधी केली नव्हती. त्यामुळे या मुलांना सुधारणे अशक्यच आहे, असल्या जुन्या विचारांनी हळूहळू डोके वर काढायला सुरुवात केली होती. शिवाय हे प्रयत्न सोडून द्यावेत असे शिक्षकवर्ग उघड उघड बोलायला लागला होता.

इवानोविचने तर प्रत्यक्ष बोलूनच दाखवले, 'सालं फुकट गेलं. काराबानोव-सारखा मुलगा पहा! आपल्याला त्याचा केवढा अभिमान वाटायचा! पण त्यालाच आपल्याला या कॉलनीतून हाकलावं लागलं. असादची, वेर्शनेव, तारानेट किंवा वोल्कोव या कुणाहीबद्दल आशा बाळगण्याचं कारण नाही. ते सारे एकाच माळेचे मणी! त्यात बेलुखिनसारखा एखादाच. म्हणून त्या एकट्यासाठीच काय आपण एवढी मोठी कॉलनी चालवायची?'

एके काळी माझ्या परम स्नेही व माझ्या विचारांच्या पूर्ण भागीदारी असलेल्या एकातेरीनाबाईसुद्धा हळूहळू माघार घेऊ लागल्या होत्या. त्या त्यांचे विचारही अशाच विचित्र तऱ्हेने मांडू लागल्या होत्या.

'खरं सांगू, आपण खरोखरीच फार मोठी चूक करीत आहोत. सामूहिक जीवन आहे अशी कल्पना करून आपण राहिलो; पण हे खरं सामूहिक जीवन

नसून सामूहिक जीवनाच्या कल्पनेनं आपण स्वत: भारावून गेलो होतो. व दिवास्वप्न बघत होतो !'

त्यावर मी बाईंना म्हटले, 'हे तुमचं विधान चुकीचं आहे. आपलं जीवन सामूहिक आहे. पहा बरं, ही साठ मुलं, त्यांचं दैनंदिन जीवन, ती करीत असलेली कामं, त्यांची आपसातली दोस्ती हे इतकं एकरूप झालेलं आहे की, त्याला सामुदायिक जीवन नाही असं कसं म्हणता येईल ?'

यावर त्या मला म्हणाल्या, 'खरं तर हा नुसता खेळ होता—फार हुषारीनं जमवलेला खेळ म्हणा पाहिजे तर. आपण त्यात रंगून गेलो आणि मुलंही थोडा वेळ आपल्याबरोबर त्यात रंगली; पण ते सारं थोडा काळच टिकलं आणि आता मात्र आपण सारे या खेळात थकलो, कंटाळलो आहोत. कदाचित आपण तो सोडू-नही देऊ. शेवटी राहील काय, तर एक उन्मार्गी मुलांची शाळा !'

'अहो, एका खेळाचा कंटाळा आला तर तो आपण सोडून देऊ. म्हणून दुसरा खेळ खेळून बघू नये असं कोणी सांगितलंय ?' लिडिया एकातेरीना बाईंना म्हणाली.

आम्ही सारेच जण उदासवाणे हसलो; पण हे सहजासहजी सोडून द्यायला माझी बिलकुल तयारी नव्हती.

'हा सगळा तुमचा मध्यमवर्गीय बुद्धिवादी लोकांचा दृष्टिकोन आहे,' मी म्हणालो, 'तुमच्या लहरीनुसार परिणाम दिसले नाहीत म्हणून उगाचच कुर-कुरायचं याला काही अर्थ नाही. मिट्यागिन व काराबानोव यांना आपण परत आणावं असं तुम्हाला मनापासून वाटतं आपल्या इच्छेप्रमाणे कोणतीही गोष्ट पूर्णत्वाला गेली नाही तर मुसमुसू रडत बसणं किंवा हातपाय गाळून स्वस्थ बसणं हा शुद्ध वेडेपणा आहे !'

मी हे सारं ब्रह्मज्ञान त्यांना सांगितले खरे; पण मीसुद्धा त्यांच्याचसारखा एक होतो. मीसुद्धा केव्हा केव्हा सारे काही सोडून देण्याचे विचार डोक्यात घोळवीत असे. इतकेच काय, पण बेलुखिन किंवा झादारोव यांच्याबद्दलसुद्धा मला फारशी आशा वाटत नव्हती. आम्ही खरोखरच फार थकलो होतो आणि म्हणून आमच्या वाट्याला अपयश येत असावे, असे फार तीव्रतेने जाणवू लागले होते.

माझ्या नेहमीच्या सोशिक आणि शांत स्वभावाने मला अजून सोडले नव्हते. म्हणून आमच्या शिक्षकमंडळीत आणि बाकीच्या कार्यकर्त्यांत मी सतत उत्साह आणायचा प्रयत्न सोडला नाही. आपली दुःखे, आपल्याला होणारा त्रास हे काही कायम टिकणारे नाहीत. हळूहळू सगळे काही ठीक होईल, असा मला विश्वास होता व मी आमच्या शिक्षक लोकांना त्यांच्या सोशिकपणाबद्दल शाबासकी देत असे.

आमची शिक्षकमंडळी पूर्वीप्रमाणेच शिस्तबद्ध व कर्तव्यदक्ष होती. ते वेळेवर आपापली कामे करीत. त्यांनी केव्हाही कुरकुर, कुरबूर केली नाही.

एखादे मशीन सतत चालत रहाते त्याप्रमाणे कॉलनीचे जीवन हास्यविनोदाशिवाय संथपणाने चालले होते. त्याच्यात काहीही अडथळा येत नव्हता. त्या दोन मुलांना कॉलनीतून काढल्यामुळे खरोखरच काही चांगल्या गोष्टी घडून आल्या होत्या. हे आमच्या नजरेतून सुटले नाही. गावकऱ्यांच्या घरातल्या चोऱ्या, कलिगडाच्या शेतावर होणाऱ्या चोऱ्या इतिहासजमा झाल्या होत्या. माझ्या मुलांच्या मनावर आलेल्या औदासिन्याकडे मी जाणूनबुजून डोळेझाक करीत होतो. सर्व काही सुरळीत आणि शिस्तबद्ध चालले आहे याकडेच माझे सारे लक्ष आहे, असे मी भासवीत होतो. अशा प्रकारचे वातावरण हाच जणू कॉलनीच्या जीवनाचा स्थायीभाव आहे, अशी समजूत करून देत होतो.

नवीन नवीन योजना पुढे येत होत्या. आम्ही नव्या कॉलनीत कलमे ठेवण्यासाठी एक उष्माघर बांधायला घेतले. कॉलनीतले रस्ते दुरुस्त करून घ्यायला सुरुवात केली आणि ट्रेपके इमारतीचे कुंपण, कमानी बांधायला सुरुवात केली. एक छोटासा पूल कोलोमाक नदीचे अरुंद पात्र असलेल्या ठिकाणी बांधायला घेतला. त्याच्यासाठी लागणारे साहित्य आमच्या लोहार खात्यातच तयार होत होते. तसेच आजूबाजूला पडझड झालेली घरे दुरुस्त करावयाचे काम जोरात सुरु होते. मी जाणूनबुजून काम वाढवीतच होतो. प्रत्येक काम अतिशय काळजीपूर्वक व व्यवस्थित करवून घेण्याची धडपड करीत होतो. यामागे एवढाच हेतू होता की, मुलाचे लक्ष इतर गोष्टींकडे वेधले जाऊ नये व वेळोवेळी आणि व्यवस्थित काम करवून घेण्याबद्दल आमची जी ख्याती होती ती कायम रहावी.

मी लष्करी शिक्षण का घेतले, हे काही मला सांगता येणार नाही. कदाचित माझ्यातल्या सुप्त शिक्षकाला त्याची जरूरी भासली असावी.

मी काही दिवसांपूर्वी कॉलनीत कसरतीचे व कवायतीचे शिक्षण द्यायला सुरुवात केली होती. मी स्वतः काही मोठा पहिलवान नव्हतो आणि कुणी तसा नेमण्याचीही आमची ऐपत नव्हती. मला लढाईला आवश्यक असलेली थोडी-बहुत सैनिकी कसरतीची आणि कवायतीची माहिती होती. कुठल्याही तऱ्हेने फारसा ऊहापोह न करता किंवा प्रचलित शिक्षणतंत्रात ते बसेल की नाही याची शंका मनात न आणता मी मुलांना या गोष्टी उपयुक्ततेच्या दृष्टीने शिकवायला सुरुवात केली.

मुलांनी पण याचे मनापासून स्वागत केले. दिवसभराचे काम झाल्यानंतर सर्व मुले कॉलनीच्या पटांगणात जमत असत आणि आम्ही तास-दीड तास कवायत करत असू. आमच्या अनुभवामधून नवीन कामे वाढवायला आम्ही सुरुवात केली,

आमच्या हालचालींचे क्षेत्र आम्ही हळूहळू वाढवायला सुरुवात केली. आमचे मुख्य लक्ष्य भांडारे, झोपड्या अशा जागा असत. अशा वेळी भिंतीचा आसरा घेऊन उभे राहिलेले सर्वजण आपल्या झोपड्या व भांडारे बंद करून मोकळ्या मैदानात येत आणि जमिनीवर पालथे पडून पुढच्या घडामोडींची वाट बघत बसत.

या सगळ्याची मुलांना फार मौज वाटत होती. मग मात्र खरोखरीच आम्ही खऱ्याखुऱ्या बंदुका मिळविल्या. सर्वसाधारण लष्करी शिक्षण खात्यात आम्हाला प्रवेशही मिळाला. त्यांनी आमच्या मुलांच्या भूतकाळाबद्दल काहीही चौकशी केली नाही.

ही कवायत घेत असताना मी एखाद्या मोठ्या सेनाधिकाऱ्यासारखा अतिशय काटेकोरपणाने वागत असे आणि मुलांनीही त्याबद्दल कधी कूरकूर केली नाही. अशा तऱ्हेने खरोखरच आम्ही एका नव्या खेळाचा पाया घातला आणि त्या पाया-वरच पुढचे आमचे सारे आयुष्य व्यवस्थितपणे बांधले गेले.

मुख्य गोष्ट म्हणजे या लष्करी कवायतीमुळे आमच्या मुलांच्यावर चांगला परिणाम झाला. त्यांचे एकंदर बाह्यांगच बदलून गेले. त्यांचा गबाळेपणा जाऊन ती तरतरीत व व्यवस्थित दिसू लागली. साधे उभे रहातानासुद्धा ती मुले भिंतीला किंवा टेबलाला न चिकटता अगदी ताठ आणि व्यवस्थित उभे रहायला शिकली. आता कॉलनीत आलेला कोणताही नवीन मुलगा व आमची जुनी मुले यांच्यातला फरक चटकन ध्यानात येत असे. मुलांचे चालणे शिस्तबद्ध व्हायला लागले. मान ताठ ठेवून चालायची सवय त्यांनी लावून घेतली आणि खिशात हात घालून उभे रहायची सवय साफ सोडून दिली.

या सैनिकी शिस्तीमुळे आपल्या पोरबुद्धीनुसार मुलांनी नाविक व लष्करी शिक्षणाकडे कल दाखवायला सुरुवात केली. याच वेळी कॉलनीमध्ये कुठल्याही हुकुमाला उत्तर देताना किंवा त्याची अंमलबजावणी झालेली सांगताना 'फारच उत्तम' असा शब्दप्रयोग आणायचा नियम काढला. प्रत्येक वेळी उत्तर देताना सलाम ठोकून, उभे राहून उत्तर द्यायचे असे ठरविण्यात आले. तसेच आम्ही काही ठराविक वेळी बिगुल वाजवायची पद्धतही याच वेळी अंमलात आणली.

आतापर्यंत कोणताही इशारा घंटी वाजवून देण्यात येत असे; परंतु आता मात्र आम्ही दोन बिगुल विकत आणले आणि त्याकरवी इशारे दिले जाऊ लागले. काही मुले दररोज शहरात जाऊन बँडमास्तरांकडून बिगुल वाजविण्याचे धडे घेऊ लागली. तसेच सर्व इशारे व्यवस्थित कागदावर लिहून काढले गेले. प्रत्येक वेळी मुले कसला इशारा द्यावयाचा ते वाचून त्याप्रमाणे बिगुल वाजवू लागले. हिवा-ळ्याच्या सुरुवातीला आम्ही घंटीला कॉलनीच्या आयुष्यातून अजिबात रजा दिली.

बिगुलवाला माझ्या पोर्चमध्ये सकाळी येऊन सुस्वर आवाजात निरनिराळे इशारे देऊ लागला.

संध्याकाळच्या वेळी या इशाऱ्याचे बिगुल कॉलनीत वाजू लागत आणि त्याचे पडसाद बाजूचा तलाव, रस्ते व घरे यात दुमदुमत असत. कोणी कोणी या बिगुलाच्या आवाजाला शीळ घालून साथ देत किंवा दुसरे काहीजण पियानो वाजवूना साथ देत असत.

आमच्या सैनिकी शिक्षणाची बातमी पब्लिक एज्युकेशन खात्याला कळल्यावर ते आमच्या कॉलनीला ' बरॅकी ' या नावाने हिणवू लागले; परंतु मी काही त्या गोष्टीकडे फारसे लक्ष दिले नाही. दुसरी अनेक कामे माझ्यासमोर पडलेली होती. मला इतकी कामे होती की, या निरर्थक गोष्टीकडे लक्ष द्यायला मला फुरसतच नव्हती.

ऑगस्ट महिन्यात मी दोन छोटी डुकरे कॉलनीत वाढविण्यासाठी आणली. ती दोन्ही अस्सल इंग्लिश जातीची होती व जणू काही आमच्या जबरदस्तीच्या सामुदायिकात मिसळून जायला त्यांनी नकार दिला. त्यांचा उच्छृंखलपणा एवढा वाढला की, त्यांनी आमच्या ब्रातचिन्कोचा राग ओढवून घेतला.

तो एके दिवशी म्हणाला, ' जणू काही इथं कमीच त्रास होतो, म्हणून त्यात भर घालायला ही दोन डुकरे आमच्याकडे आली ! '

त्या इंग्लिश मंडळींना आम्ही नव्या कॉलनीत पाठवून दिले. तिथे त्या दोघांचे लोकांनी आनंदाने स्वागत केले. त्या वेळी जवळजवळ वीसएक मुले नव्या कॉलनीत रहात असत. त्या सर्वांच्या बरोबर रोडीम्चीक नावाची एक सामान्य व्यक्ती शिक्षक म्हणून होती. मोठ्या घराचा एक विभाग दुरूस्त करून पूर्ण झाला होता आणि त्यातच आम्ही निरनिराळी वर्कशॉप्स् व क्लासरूम्स तयार करण्याचे ठरविले होते; पण सध्या मात्र ही मुले तिथेच रहात. अजूनही काही छोटी छोटी घरे आणि बऱ्याचशा गोष्टी दुरूस्त झाल्या होत्या, तरी एक-दोन माळ्यांची, डौलदार घाटाची भव्य इमारत दुरूस्त व्हायची राहिली होती आणि त्याचा उपयोग मुलांच्या रहाण्याच्या खोलीसाठी करायचे ठरवले होते. जिथे जिथे जरुरी होती तिथे तिथे दुरूस्तीचे काम चालू होते.

आमच्या शेतीच्या कामावरही आम्ही आमचे लक्ष केन्द्रित करायचे ठरवले होते आणि त्यासाठी लवकरच एक शेतीतज्ञ-एडवर्ड निकोलाएविच शेरे या गृहस्थांची-नेमणूक केली होती. आजवर आमच्या मुलांनी कधीही न पाहिलेली अशी ही व्यक्ती आमच्या शेतातून कामे करू लागली.

कालिनासाहेबांसारखे हे गृहस्थ अतिउत्साही किंवा चिडखोर नव्हते. याउलट

ते सदैव खिलाडू वृत्तीचे होते. हे कॉलनीतल्या कुठल्याही व्यक्तीला तुम्ही म्हणून संबोधत असत. त्यांनी आपला आवाज कधीही चढवला नाही किंवा कोणाशी अकारण दोस्तीही केली नाही. एकदा प्रिखोदकोवने उद्धटपणे विशिष्ट शेतामध्ये काम करण्याचे नाकारले. त्या वेळी शेरेसाहेबांनी न चिडता, न रागावता त्याला फार मार्मिक उत्तर दिले.

'ठीक आहे. तुम्ही हे सांगितलंत ते फार बरं केलंत म्हणजे आता कोणतंही काम तुम्हाला सांगण्याची चूक माझ्या हातून होणार नाही !.' या उत्तरामुळे सारी मुले चकितच झाली.

प्रिखोदकोवने त्यांना सांगितले की, 'ते विशिष्ट काम सोडून बाकी कुठलंही काम करायची आपली तयारी आहे !'

यावर शेरेसाहेबांनी त्याला परत तसेच एक मजेशीर उत्तर दिले, 'जाऊ द्या हो, तुम्हाला माहीत आहे का, तुमच्यावाचून माझं काही एक अडणार नाही आणि कृपा करून तुम्ही दुसरं कसलं तरी काम शोधून घ्या !'

'असं का म्हणता ?' प्रिखोदकोवने विचारले.

'उगाच चर्चा करण्यात वेळ न घालविता फक्त आपलं नाव कृपा करून मला सांगा !' शेरेसाहेब म्हणाले.

प्रिखोदकोवचा हट्ट आपोआपच संपुष्टात आला. त्याने घुश्श्यातच खांदे उडवले आणि तो त्या झुडुपात काम करायला गेला. थोड्या वेळापूर्वी हे काम करण्याचा त्याला कमीपणा वाटत होता; तेच त्याने करायचे कबूल केले.

शेरेसाहेब साधारण मध्यम वयाकडे झुकलेले होते; परंतु त्यांचा आत्मविश्वास दांडगा होता. त्यांचा काम करण्याचा उरक पाहून आमची मुले अचंबा करीत. ते कधी झोपतच नसावेत असे मुलांना वाटायचे. कॉलनीतली मंडळी नुकतीच झोपेतून उठत असत; पण त्या वेळेस शेरेसाहेब शेतात काम करताना दिसत असत. झोपायला जायचा बिगुल वाजला तरी ते डुकरांच्या खुराड्यासंबंधी सुताराशी बोलताना आढळून येत. दिवसासुद्धा शेरेसाहेब घोड्यांचा तबेला, झाडाच्या कलमांची घरे, शहराकडे जाणाऱ्या रस्त्यावर किंवा शेतामध्ये खत घालताना एकाच वेळी दिसत असा भास होई. इतक्या वेगाने त्यांची कामे एका पाठोपाठ एक चालत असत.

शेरेसाहेब आल्याच्या दुसऱ्या दिवशी शेरेसाहेबांची व ब्रातचिन्कोची तबेल्यामध्ये काही बाचाबाची झाली. ब्रातचिन्कोला शेरेसाहेबांच्या हिशेबीपणाचा राग आला होता. त्याच्या मते घोड्यासारख्या मुक्या प्राण्याच्या बाबतीत शेरे साहेबांनी असा हिशेबीपणा दाखवणे बरे नव्हे. त्याला वाटे, हे मोजूनमापून खायला घालणे विचित्रच आहे.

तो म्हणे, 'यापेक्षा जास्त खायला द्यायच नाही म्हणजे काय ? ते खाणंसुद्धा थोडा पेंढा, थोडा हरभरा असं थोडं थोडं सारं द्यायचं आणि उद्या घोडे मेले तर याला जबाबदार कोण ? मीच ! दुसरं म्हणे आपण तासावर काम करायचं. एक पुस्तक आणि एक वही घेऊन त्याच्यामध्ये तुम्ही किती व कसं काम करता ते लिहा, असं शेरेसाहेब सांगतात ! '

ब्रातचिन्कोच्या आरडाओरडयाने शेरेसाहेब काही घाबरून जाणारे नव्हते. फाल्कन हा ब्रातचिन्कोच्या मनातून शेरेसाहेबांना कामासाठी द्यावयाचा नव्हता; परंतु शेरेसाहेबांनी ब्रातचिन्कोच्या आरडाओरडयाकडे संपूर्णपणे दुर्लक्ष केले. ते स्वत: तबेल्यात गेले आणि फाल्कनला त्यांनी बाहेर आणून सरळ गाडीला जुंपले. यावर ब्रातचिन्को चडफडला आणि त्याने चाबूक कोपऱ्यात फेकून देऊन तो रागारागाने तबेल्याच्या बाहेर निघून गेला. संध्याकाळी त्याने तबेल्यात डोकावून पाहिले असता त्याला ऑलोव्ह आणि बब्लिक तबेल्यात काम करताना दिसले. ब्रातचिन्कोला कमालीचा धक्का बसला. त्याने माझ्या ऑफिसाकडे दाद मागण्यासाठी धाव घेतली; पण वाटेतच शेरेसाहेबांनी त्याला गाठले आणि त्याच्यापुढे कागद धरून जणू काही झालेच नाही अशा थाटात त्याला विचारले,

'आपलं नाव ब्रातचिन्को ना ? हे पहा, या कागदावर तुमच्या आठवडयाच्या कामाचा तपशील दिलेला आहे. प्रत्येक घोडयानं प्रत्येक दिवशी किती काम करावं, त्याला बाहेर हिंडायला केव्हा न्यावं वगैरे लिहिलं आहे. तसंच कुठल्या घोडयाला गाडीला जुंपावे आणि कुठल्या घोडयाला विश्रांती द्यावी हेही त्यात नमूद केलं आहे. तुम्ही तुमच्या दोस्तांसमवेत हे सारं वाचून पहा आणि त्यात काही सुधारणा हव्या असल्या तर उद्या त्या मला सांगा!'

ब्रातचिन्को स्तिमितच झाला आणि तो कागद घेऊन तबेल्याकडे परत गेला.

गंमत म्हणजे दुसऱ्या दिवशी कुरळया केसांचा ब्रातचिन्को आणि तुळतुळीत डोक्याचा शेरेसाहेब, दोघेही शेजारी शेजारी माझ्या टेबलाजवळ बसून गंभीरपणानें काही चर्चा करीत होते. मी पलीकडच्या टेबलावर माझे काम करीत होतो. मधून-मधून मी त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत होतो. त्यांची चर्चा जोरजोरात चालू होती.

'रेड आणि बॅंडिट या दोघांनाही बुधवारी नांगराला जुंपायला हरकत नाही.'

'लॅडी बीट खाऊ शकत नाही, तिचे दात......'

'अहं ! त्याचं काय मोठंसं ? ती चांगली बारीक चिरून त्यांना द्यावी. पहा करून !'

'समजा, कुणाला मध्येच शहरात कामासाठी जावं लागलं तर ?'

'त्यांनी पाहिजे तर पायी जावं किंवा शेजारच्या गावातनं घोडं भाड्यानं घ्यावं. आपल्याला त्याच्याशी काय करायचंय ?'

'वा, वा ! ही सारी उत्तम व्यवस्था झाली !' ब्रातचिन्को म्हणाला.

एक घोडा प्रत्येक दिवशी वाहतुकीसाठी आम्हाला पुरा पडत नसे ही गोष्ट तर कबूल करायलाच पाहिजे होती. कालिनासाहेब शेरेसाहेबांपुढं पुरे पडत नसत. कारण प्रत्येक वेळी शेरेसाहेबांच्या शांत वक्तव्यापुढे ते काही बोलू शकत नसत.

शेरेसाहेब सांगत, 'तुमच्या वाहतुकीच्या प्रश्नाशी मला काहीही कर्तव्य नाही. तुम्ही आणावयाचा माल कसाही आणा. पाहिजे तर तुम्ही नवा घोडा खरेदी करा; पण मी यातला घोडा देणार नाही! कारण मला साठ एकर जमिनीत नांगरणी करायची आहे. पुन्हा या घोड्यांच्या प्रश्नावर कधीही माझ्याशी चर्चा करू नका !'

यावर कालिनासाहेब रागाने ओरडून सांगत,

'मला घोडा हवा असला तर मी तो स्वतः जुपून घेईन, समजलात ?'

यावर शेरेसाहेब काही बोलत नसत. ते हातातल्या वहीत काही तरी लिहित. एका तासाभराने ऑफिसातून बाहेर पडता पडता त्यांनी मला सांगितले,

'हे पहा, मी ठरवून दिलेल्या घोड्यांच्या कार्यक्रमात मला विचारल्याशिवाय कोणी ढवळाढवळ केली तर मी ताबडतोब कॉलनी सोडून निघून जाईन !'

मी घाईघाईने कालिनासाहेबांना बोलावणे पाठवले आणि त्यांना विनंती केली,

'तुम्ही कृपा करून याच्यामध्ये पडू नका आणि त्याला त्रास देऊ नका !'

यावर कालिनासाहेब म्हणाले, 'अहो, मी एका घोडा घेऊन कसं काम करू ? आपल्याला शहरात जावं लागतं. आपल्याला जळणाचं लाकूड आणावं लागतं, पाणी आणावं लागतं तसंच साऱ्या वस्तू शहरातून आणाव्या लागतात, कशा आणणार त्या, सांगा पाहू!'

'यावर आपण काही तरी मार्ग काढू !' मी त्यांना अशा रीतीने समजावले.

आम्ही खरोखरच मार्ग शोधून काढला. नवीन नवीन चेहेरे, वाढणाऱ्या नव्या नव्या काळज्या व नवीन कॉलनीचे काम, तसेच तिथे पाठविलेले आमचे रोडीम्चीक शिक्षक, आमची दिवसेंदिवस होणारी प्रगती या सर्वांनी मिळून आमचे जुने दारिद्र्य आणि आमच्यावर मध्यंतरी आलेली औदासीन्याची छाया यावर मात केली. १९२२ च्या अखेरीस घडलेल्या भानगडीमुळे आणि घडामोडीमुळे मनातून कितीही आनंद वाटला तरी तो बाहेर न दाखविता मी कमालीच्या साधेपणाचा आव आणीत असे. जणू काही या मुखवटयाचा मला त्रास होत नसे; पण कॉलनीतल्या बाकीच्यांना

ते फार डाचत असे. त्यांना कदाचित याचे खरेखुरे स्वरूप कळले असेल किंवा नाही हे मी सांगू शकत नाही; परंतु त्याचे एकंदर वर्तन माझ्याशी जरा जास्तच सभ्यपणाचे आणि औपचारिकपणाचे होत असे. याउलट मी जर त्यांच्यात मिसळलो असतो, त्यांच्याबरोबर खेळात भाग घेतला असता किंवा हातात हात घालून फिरलो असतो, तर त्यांना कमालीचा आनंद झाला असता हे मी पक्के जाणून होतो.

परंतु आम्ही लवकरच हा दिखाऊ साधेपणा आणि सभ्यपणा सोडून दिला. तरीसुद्धा हा बदल आमच्यात कसा व नक्की केव्हा झाला हे आमच्यापैकी कोणीच सांगू शकले नसते. पुन्हा आपली सगळेजण मोकळेपणाने हसू-खेळू लागलो. थट्टा-मस्करी करू लागलो व भरपूर कामही करू लागलो. पण यात फरक एकच होता, पूर्वीसारखी शिस्त आम्ही कधीही मोडली नाही किंवा कोणत्याही प्रकारचा धरसोडपणाही केला नाही.

अखेर कालिनासाहेबांनी त्यांची वाहतुकीची अडचण सोडविली. गावरुष्का नावाचा एकच बैल आमच्याकडे होता आणि शेरेसाहेबांना त्याची जरूरी नव्हती. त्या एका बैलाची आम्ही गाडी बनविली व त्यातून पाणी आणि जळाऊ लाकडाची ने-आण करायला सुरुवात केली. एप्रिल महिन्याच्या एका दिवशी आम्ही संबंध कॉलनीतले लोक अतिशय आनंदात खूप खूप हसलो. असा आनंद आणि असे हसू आम्ही कित्येक दिवसात अनुभवले नव्हते. ब्रातचिन्कोने एक दिवस जवळच्या शहरातून एक छकडा आणला व तो आमचा एकुलता एक बैल त्या छकड्याला जुंपला.

'याबद्दल तुला शिक्षा होईल हा!' मी बजावले.

तो म्हणाला, 'बघू तर खरं. आपण आता सारे सारखेच आहोत आणि हा बैलही घोड्यासारखाच आहे. कारण तो एक कसणाराच आहे.'

आमचा बैल आनंदाने ती गाडी त्या दिवशी शहराकडे घेऊन गेला.



# २४

# सेमियानची साहसे

शेरेसाहेब झपाट्याने नवीन नवीन गोष्टी करीत होते. त्यांनी यंदा उन्हाळ्यात एक नवीन प्रकारची पेरणी-योजना काढली होती. त्यामुळे साऱ्या कॉलनीभर उत्साहाचे वातावरण भरले होते. सारा वेळभर शेरेसाहेब नवीन शेतीयोजनेचे विचार करीत असत. ते कुठेही असोत – शेतात, तबेल्यात, डॉरमिटरीत, रस्त्यावर, माझ्या ऑफिसात किंवा जेवणाच्या खोलीत–मुले त्यांचा कुठलाही हुकूम चर्चा केल्याशिवाय अंमलात आणीत नसत. शेरेसाहेब खरोखरीच विधायक सूचना असल्या तर धुडकावून लावीत नसत. याउलट कधी कधी त्यांचा जास्त चांगल्या तऱ्हेनं ऊहापोह पण करीत असत; पण शेवटी मी म्हणतो तसे कर, असे सांगायलाही विसरत नसत.

सबंध दिवसभर त्यांचे काम सतत चालू असे आणि त्यांच्या बरोबरीने वेग ठेवणे पुष्कळदा आम्हाला जमत नसे; परंतु ते सदैव अतिशय उत्साहाने आणि शांतपणाने इकडून तिकडे धावपळ करीत. दोन ते तीन तास गव्हाणीमध्ये, पाच-पाच तास पेरणी यंत्रामागे आणि प्रत्येक दहा मिनिटांनी डुकरांच्या खुराड्यात वाकून बघत व डुकरे सांभाळणाऱ्यांना निरनिराळे प्रश्न विचारीत.

' डुकरांना खायला केव्हा दिलंत ? त्याची वेळ लिहिली का ? मी ज्या तऱ्हेनं सांगितलं होतं त्याच तऱ्हेने तुम्ही लिहिलंय ना ? त्यांना धुवून काढण्याची व्यवस्था केली का ?' वगैरे प्रश्न ते विचारीत.

कॉलनीचे लोक शेरेसाहेबांबद्दल जरा बेताबेतानेच उत्साह दाखवीत. ते त्याला '(आमचे शेरेसाहेब फारच गंमतीदार आहेत,' असे म्हणत. 'ते आमच्या इथे आहेत म्हणूनच ते खरोखर तसे आहेत. दुसऱ्या एखाद्या ठिकाणी ते इतके चांगले व मजेदार राहिले नसते ! ' यावरून शेरेसाहेबांबद्दल मुलांना किती आदर होता, हे दिसून येत असे. शेरेसाहेबांच्या अधिकाराला मिळणाऱ्या मूक संमतीवरून, त्यांच्या शब्दाबद्दल आपापसात चाललेल्या चर्चेवरून तसेच त्यांच्या ज्ञानाबद्दल व आत्यंतिक कळकळीबद्दल असलेला आदर मुलांच्या उत्साहित वागवणुकीवरून दिसून येई.

मुले, फक्त त्यांच्यावर दया दाखविणारे किंवा कोरडे कौतुक करणारे यांच्या-वर प्रेम करीत नाहीत याबद्दल शकाच नव्हती. या तत्त्वावर मी कधीच विश्वास ठेवला नव्हता. म्हणून शेरेसाहेबांबद्दल मुलांना जो आदर वाटत होता त्यामुळे हा हा माझा विश्वास दृढ झाला. माझी फार पूर्वीपासून खात्री झाली होती की तरुण मुलांना खरा आदर व प्रेम–विशेषतः आमच्या कॉलनीच्या मुलांना–निराळ्याच प्रकारच्या लोकांबद्दल वाटत असे.

खरी पात्रता, सखोल ज्ञान, कामाचा उरक, जाडच्या जाडच्या शब्दांचा कमी वापर, शांतपणाने काम करायची पद्धत याच गोष्टी तरुणांना जास्तीत जास्त आकर्षित करीत असतात.

तुम्ही त्यांच्याबरोबर कितीही कडकपणाने वागलात किंवा दुर्लक्ष केलेत, त्यांना टाळायचा प्रयत्न केलात आणि तुम्ही जर तुमच्या कामात वाकबगार असाल, तर तुमचे ज्ञान आणि तुम्हाला येणारे यश याबद्दल तुम्हाला कधीही काळजी करा-यचे कारण नाही. तुम्ही त्याना तुमच्या बाजूला वळवून घेऊ शकता आणि ते तुम्हाला कधीही सोडणार नाहीत. तुम्ही कोण आहात आणि कसे आहात–फिटर आहात, लोहार आहात की इंजिनड्रायव्हर आहात–याबद्दल ते फारसा विचार करीत नाहीत.

याउलट तुम्ही कितीही दयाळू असाल किंवा तुमचे संभाषण कितीही मनोरंजक असेल, तुम्ही कितीही चांगल्या स्वभावाचे असाल किंवा तुमचे व्यक्तिमत्त्व कितीही आकर्षक असले तरी जर तुमच्या कामात तुम्हाला प्रत्येक वेळी अपयश येत राहिले आणि तुम्हाला कामाची जर बरोबर माहिती नसेल किंवा कोणतेही काम तुमच्या हातून बिघडत असेल तर तुम्हाला योग्य तो मान मिळणार नाही. उलट तुमच्या वाट्याला घृणाच येईल हे नक्कीच !

एकदा असे झाले की, एका भट्टी बनवणाऱ्याला कॉलनीत बोलावण्यात आले. मुलींच्या डॉरमिटरीत भट्टी बनवायची होती. भट्टी बनवणारा सहज आमच्या कॉलनीत आला होता आणि दिवसभर आमच्या कॉलनीत रमला होता. त्याने कुणाच्या तरी घरातली भट्टी दुरुस्त केली होती. तसेच कुणाच्या तरी तबेल्याच्या

भिंतीची डागडुजी केली होती. तो माणूस दिसण्यात जरा गुबगुबीत, टकल्या व बोलण्यात अगदी मिठ्ठास होता. त्याच्या बोलण्यावरून त्याच्याइतका हुषार व वाकबगार भट्टी बांधणारा दुसरा मिळाला नसता.

मुले दिवसभर त्याच्या भोवती भोवती फिरत होती आणि त्याचे बोलणे व त्याच्या लांबलचक गप्पा ऐकून घेत होती.

'मुलांनो, किती तरी भट्टी बांधणारे लोक माझ्यापेक्षा पुष्कळ मोठे होते; पण त्या फलाण्या काउंटला कुणाचंच काम पसंत पडत नसे. ते म्हणायचे, 'आर्टेमीलाच बोलवा. कारण त्यानं बांधलेली भट्टी हीच खरी भट्टी!' आणि मी खरोखरच किती तरी लहान, तसं पाहिलं तर. आणि काउंटच्या घरात भट्टी बांधायची म्हणजे काय चेष्टा होती? म्हणजे माझ्या बोलण्याचा अर्थ समजला ना?'

काउंट म्हणायचे, 'आर्टेमी, उत्तम काम कर हं!'

त्यावर मुलांनी त्याला विचारलं, 'अरे वा! तुमचं काम कसं काय झालं?'

'शंकाच नाही. फारच उत्तम!'

त्याने आपली साखळी काढली व काउंट त्या भट्टीकडे कसा बघत असे ते दाखवले. मुलांना अर्थातच राहवले नाही आणि त्यांनी मोठ्याने हसायला सुरुवात केली. कारण काउंटची नक्कल करताना आर्टेमी फारच विचित्र दिसत होता.

आर्टेमीने मोठाच आव आणून आमची भट्टी बांधायला सुरुवात केली. त्याने बनवलेल्या चांगल्यात चांगल्या भट्ट्या किंवा दुसऱ्या कोणी बनविलेल्या वाईट भट्ट्या यापेक्षाही अगदी वेगळीच भट्टी तो तयार करणार होता. त्याने मूर्खासारख्या त्याच्या तंत्रातल्या खाचाखोचा व त्यातल्या लांड्यालबाड्या मुलांना अगोदरच सांगून टाकल्या. त्यानें पुढे सांगितले, 'त्रिज्या जर बरोबर काढली तर काम सोपं होतं; पण पुष्कळ लोकांना ती त्रिज्याच काढता येत नाही!

सारी मुले मुलींच्या डॉरमिटरीकडे एकसारखी खेपा घालीत होती आणि आर्टेमीची त्रिज्या कशी निघते आहे याचा शोध घेत होती.

आर्टेमी भट्टी बांधायला सुरुवात करीत असल्यापासून सतत बडबडत होता; परंतु त्याने जेव्हा भट्टी वरती चढायला सुरुवात केली त्या वेळेस त्याला भट्टी बांधायची माहिती नव्हती हे स्पष्ट झाले आणि त्याची बडबडही थोडा वेळ थांबली.

आर्टेमीचे काम कसे चालले आहे ते बघण्यासाठी मी तिकडे गेलो होतो. मुले माझ्या तोंडाकडे बारकाईने पहात होती. मी नापसंतीदर्शक मान हलवून आर्टेमीला विचारले,

'अरे, ही एवढी बेढब का दिसते?'

'बेढब कशी? अजून ती पुरी व्हावयाची आहे. मग ती चांगली दिसेल!' तो म्हणाला.

झादारोवने डोळे किलकिले करून भट्टीकडे पाहिले व विचारले, 'काय हो' काउंटच्या घरी पण ती अशीच बेढब दिसत होती का ?' पण आर्टेमीला या शब्दातली खोच कळलीच नाही.

'पुरी तयार होईपर्यंत साऱ्याच भट्टया अशा दिसतात !' त्यानं उत्तर दिलं.

तीन दिवस आर्टेमीने भुणभुण लावली होती. सबंध कॉलनीभर ही बातमी पसरली. आर्टेमी आपण केलेले काम उत्तम आहे असे जोरात सांगत होता. ती भट्टी खोलीच्या मधोमध ठेवली होती. ती एका बाजूला आधीच झुकलेली होती. सर्वांच्या नजरेसमोर ती धाडकन कोसळली व साऱ्या खोलीभर विटा आणि धुरळा पसरला. त्याबरोबर हास्याचा कल्लोळ माजला. आजूबाजूला उभ्या असलेल्या बऱ्याच मुलांना विटांचा मारही लागला; पण त्याकडे कुणाचेच फारसे लक्ष गेले नाही. सारे जण हसत हसत डॉरमिटरीच्या बाहेर पटांगणात, व्हरांड्यात निघून गेली. काही जणांची पोटे हसून हसून दुखायला लागली. मी त्या माती आणि आणि विटांच्या ढिगाऱ्यातून कसाबसा खोलीच्या बाहेर पडलो. तिथे बुरुन आर्टेमीची गर्दन पकडून त्याला ठोसा देण्याच्या बेतात होता; पण तो थोडक्यात बचावला.

आर्टेमीला कॉलनीतून ताबडतोब हाकलून देण्यात आले; परंतु त्याचे नाव मात्र बरेच दिवस आमच्या कॉलनीत रेंगाळत राहिले. कोणी एखादा थापाड्या मनुष्य भेटला की सारे जण 'हा दुसरा आर्टेमीच आहे !' असे म्हणत.

मुलांच्या दृष्टीतून कुचकामी म्हणजे आर्टेमी व कष्टाळू म्हणजे शेरे असे मत पक्के झाले होते. त्यामुळे शेरेसाहेब कॉलनीत एकंदर फारच आवडते होते.

याचा परिणाम म्हणजे आमचे भूमिविकासाचे काम अतिशय यशस्वीपणे चालू होते. शेरेसाहेबांचा आणखी एक मोठा गुण होता, तो म्हणजे बेवारशी वस्तू शोधून काढायच्या, बिलं हाताळायची, उधार वस्तू आणायच्या वगैरे त्यांना बरोबर जमत असे. त्यामुळेच गवत कापायचे मशीन, बियाणाचे मशीन, फावडी, खोरी इतकेच काय पण गाई, बैल वगैरे गोष्टीही कॉलनीत दिसू लागल्या. तीन गाई-आमच्याकडे आल्या आणि लवकरच आम्हाला भरपूर दूध मिळेल असे उगीचच वाटायला लागले.

शेतीच्या कामाची आवड त्यामुळे बऱ्याचशा मुलांमध्ये उत्पन्न झाली. निरनिराळ्या वर्कशॉपमधून काम करणारी मुले सोडली तर बाकी सर्व मुले शेतात काम करायला जाऊ लागली. वर्कशॉपच्या पाठीमागे छोटे-छोटे वाफे त्यांनी बनवून घेतले. त्यासाठी सुताराकडून मोठमोठ्या लाकडी चौकटी त्यांनी बनवून घेतल्या. नवीन कॉलनीत तर या चौकटी फार प्रमाणात तयार झाल्या.

फेब्रुवारीच्या सुरुवातीला एके दिवशी काराबानोव कॉलनीमध्ये परत आला. आम्ही सारे शेतीच्या कामात अगदी गढून गेलो होतो. मुलांनी त्याचे अतिशय

